**शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून इयत्ता २ री ते ८ वी च्या पाठ्यपुस्तकामध्ये वह्याची पाने समाविष्ट करण्याकरीता आलेल्या खर्चाची प्रतिपुर्ती करण्यास्तव निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- संकिर्ण २०२४/प्र.क्र.५६/ एसडी-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :-३१ मार्च, २०२४

<u>संदर्भ :-</u>

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक:- संकिर्ण-२०२२/प्र.क्र.२१६/एसडी-४, दिनांक ०८.०३.२०२३.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३.
३) शासन पत्र समक्रमांक दिनांक १५.०३.२०२४.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.२०२४.
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक:-पुनर्वि-२८२३/प्र.क्र.१०२/अर्थसंकल्प, दिनांक ३१.०३.२०२४

**<u>प्रस्तावना :-</u>**

शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून इयत्ता २ री ते इयत्ता ८ वी च्या पाठ्यपुस्तकांमध्ये वह्यांची पाने समाविष्ट करण्याबाबतचा व होणाऱ्या खर्चाची प्रतिपुर्ती होण्यासाठी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी केंद्रपुरस्कृत समग्र शिक्षा योजनेच्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रकामध्ये (AWP & B) मध्ये आवश्यक निधीची तरतूद करावी व या व्यतिरिक्त लागणाऱ्या निधी साठीचा प्रस्ताव राज्यशासनास सादर करावा असा निर्णय वरील संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयास अनुसरुन राज्यातील शासनाच्या सर्व शाळांमधील विद्यार्थ्यांना वह्यांची पाने जोडलेली ४ भागातील एकात्मिक पाठयपुस्तके शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून पथदर्शी स्वरूपात उपलब्ध करून देण्यात आलेली आहेत. याकरीता रुपये ७१,४०,२६,०००/- इतका खर्च महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती मंडळाकडून करण्यात आलेला असून त्याची प्रतीपुर्ती करण्याची बाब विचाराधीन आहे. यापैकी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचेकडे गणवेश,बूट व पायमोजे याकरिता उपलब्ध असणाऱ्या निधीपैकी अखर्चित रु.१५,४५,०७,२३०/- इतका निधी याकरिता वापरण्यास वरील संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन पत्रान्वये मान्यता दिलेली आहे. संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष (२२०२आय६१२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ५५,९५,१९,०००/-इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे विभागाकडे आर्थिक वर्ष २०२३-२४ अखेर असलेल्या बचतीमधून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर निधीपैकी रुपये ५५,९५,१८,७७०/- (पंचावन्न कोटी पंच्यान्नव लाख अठरा हजार सातशे सत्तर रुपये) इतका निधी इयत्ता २ री ते ८ वी च्या पाठ्यपुस्तकांमध्ये वह्यांची पाने समाविष्ट करण्यासाठी सन २०२३-२४ मध्ये महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती मंडळाकडून खर्च करण्यात आलेल्या रक्कमेची प्रतिपुर्ती करण्यासाठी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

इयत्ता २ री ते ८ वी च्या पाठ्यपुस्तकांमध्ये वह्यांची पाने समाविष्ट करण्यासाठी सन २०२३-२४ मध्ये महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती मंडळाकडून खर्च करण्यात आलेल्या रक्कमेची प्रतिपुर्ती करण्यासाठी

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांना ५५,९५,१८,७७०/- (पंचावन्न कोटी पंच्यान्नव लाख अठरा हजार सातशे सत्तर रुपये) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२३-२४ करिता खालील लेखाशिर्षातील उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा:-

मागणी क्रमांक-ई-०२,
२२०२, सर्वसाधारण शिक्षण,
०१ प्राथमिक शिक्षण,
१०६ शिक्षक आणि इतर सेवा
(००)
(००)(०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) (२२०२आय६१२)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

३. सदर निधी आहरीत करून वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख शाखा/ लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करून निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक १२.०४.२०२३ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरिताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १६९/१४७१, दिनांक १९.०३.२०२४ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.४५४/व्यय-५, दिनांक २६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३११५०७४७९५२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.31 15:23:24 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उप मुख्यमंत्री (गृह), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.उप मुख्यमंत्री (वित्त), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा) यांचे खाजगी सचिव, मुंबई.
७) मा. विधानपरिषद/विधानसभा, सदस्य (सर्व)
८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१३) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.
१४) संचालक, महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,महाराष्ट्र, पुणे
१५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१६) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१८) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१९) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०) निवड नस्ती (एसडी-४)